महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी गट-अ पदावरील तदर्थ पदोन्नती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१४/प्र.क्र.३३५/२०१४/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ११ ऑगस्ट, २०१५

**संदर्भ :-**

१) शासन अधिसुचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/ का.१२, दिनांक २८.०४.२०१५
२) शासन अधिसुचना,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/ का.१२, दिनांक १६.७.२०१५.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवेतील सहायक गट विकास अधिकारी गट-ब मधील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक २८.०४.२०१५ आणि शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या महसुली विभाग वाटप नियम, २०१५ मधील तरतूदींच्या अधीन राहून सदर अधिकाऱ्यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.एम.सी. राठोड, सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती औरंगाबाद, जि.औरंगाबाद. | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सोनपेठ, जि.परभणी | रिक्त पदी |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| २. | श्री.एस.एस. मुंडे,<br>सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.नंदुरबार | गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती नेवासा,<br>जि.अहमदनगर. | रिक्त पदी |
| ३. | श्री.एन.टी. खैरे,<br>सहायक गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती, सेलू, जि.वर्धा. | गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती वणी,<br>जि.यवतमाळ | रिक्त पदी |

२. वरील अधिकाऱ्यांना सरळसेवेच्या कोटयावर तात्पुरत्या स्वरुपात, तदर्थ पदोन्नतीने देण्यात आलेली नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

अ) सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करण्यात येईल. सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायम स्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

ब) सदर तदर्थ पदोन्नती ही आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असणाऱ्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A. १/२०१४ आणि T.A. २/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

क) सदर तदर्थ पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ड) वरील अधिकाऱ्यांना तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

इ) सदर तदर्थ पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या वरील अधिकाऱ्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना द्याव्यात. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

४. तदर्थ पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच तदर्थ पदोन्नतीने दिलेली नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१११६२४४९२७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 917064, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SHINDE VIJAY DATTATRAYA
Date: 2015.08.11 16:32:40 +05'30'

( वि. द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद.
५. महालेखापाल- १ /२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
८. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास ) खाजगी सचिव
९. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
१०. संबंधित अधिकारी (द्वारा : संबधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
११. सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२ / कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. कार्यासन, आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१४. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग